"संवाद" मानसिक आरोग्य हेल्पलाईन महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे येथे कार्यान्वित करण्याकरीता प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.

---

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

शासन निर्णय, क्रमांक : एमएचपी-२०२३/प्र.क्र.१३९/प्रशा-१,

गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,

९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.

दिनांक : २० जुलै, २०२३

**वाचा :** संचालक, महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे यांचे पत्र जा.क्र.ममाआसं /१८८२ /२०२३, दिनांक १४/०६/२०२३.

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र राज्यामध्ये आरोग्य क्षेत्रात शिक्षण घेत असलेले बरेच विद्यार्थी नैराश्य, भिती अशा मानसिक स्थितीमधून जात असताना आत्महत्या करत असल्याचे प्रमाण वाढत असल्याची बाब निदर्शनास आली आहे. त्यामुळे अशा विद्यार्थांना मानसिक आधाराची गरज असून तज्ञ व्यक्तींकडून समुपदेशनाची आवश्यकता आहे. याकरीता राज्यात आरोग्य क्षेत्रातील विद्यार्थांकरीता "मानसिक हेल्पलाईन" सुरू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र राज्यातील व महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक यांच्याशी संलग्नित सर्व महाविद्यालयातील वैद्यकीय क्षेत्रातील विद्यार्थ्यांना मानसिक समुपदेशन करण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे येथे "**१४४९९**" या Toll free Helpline नंबर वर मानसिक आरोग्य हेल्पलाईन "**संवाद**" या नावाने सुरु करण्यात येत आहे.

२. सदर मानसिक आरोग्य हेल्पलाईन करीता संचालक - प्राध्यापक, महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे यांची नोडल अधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे.

३. सदर "संवाद" मानसिक आरोग्य हेल्पलाईन राज्यातील वैद्यकीय क्षेत्रातील विद्यार्थ्यांना समुपदेशन करण्याच्या अनुषंगाने शासकीय कार्यालयीन कामकाज वेळेनुसार सकाळी ९.०० ते सायंकाळी ६.०० पर्यंत कार्यान्वित असेल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७२१०९५७०३८७१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.07.21 10:44:14 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई
२. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
३. संचालक - प्राध्यापक, महाराष्ट्र मानसिक आरोग्य संस्था, पुणे.
४. सर्व अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, महाराष्ट्र राज्य.
५. कुलगुरू, महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक.
६. निवडनस्ती (प्रशा-१).